**श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचे मार्फत आय.ए.एस.ॲकॅडमी (SSIAC) सुरु करण्यास तत्वत: मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्र. सासंवि -१०१७/१९९२/प्र.क्र.२२५/का.१६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ ऑक्टोबर, २०१८.

संदर्भ:- १) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएस/साप्रशा/आस्था/४३२८/२०१७,दि.१८.११.२०१७

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएस/साप्रशा/आस्था/४३२८/२०१७,दि.१८.११.२०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील गोरगरीब, आदिवासी, वंचित व दुर्बल घटकांच्या विद्यार्थ्यांसाठी संस्थानच्या मौजे निघोज, ता.राहाता येथील गट नं.१७७, १७८,२८२/१,२८४ व २८८ मधील इमारत क्र.१ "बी" व "डी" मध्ये आय.ए.एस. ॲकॅडमी (SSIAC) सुरु करण्याचा प्रस्ताव व्यवस्थापन समितीच्या दि.१५.०६.२०१७ रोजीच्या सभेत मंजुर करण्यात आला. मुख्य कार्यकारी अधिकारी,श्री साईबाबा संस्थान विश्वस्त-व्यवस्था, शिर्डी यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये या प्रस्तावास तत्वत: मंजुरी देण्याची विनंती करण्यात आली होती. सदर विनंतीनुषंगाने आय.ए.एस.ॲकॅडमी सुरु करण्याच्या प्रस्तावास तत्त्वत: मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) (सुधारणा) अधिनियम,२००४ च्या कलम १७ (२)(ढ) व (ण) मधील तरतुदीनुसार राज्यातील गोरगरीब, आदिवासी, वंचित व दुर्बल घटकांच्या विद्यार्थ्यांसाठी श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी संस्थान यांच्यामार्फत मौजे निघोज, ता.राहाता येथील गट नं.१७७, १७८, २८२/१, २८४ व २८८ मधील इमारत क्र.१ "बी" व "डी" मध्ये आय. ए. एस. ॲकॅडमी (SSIAC) सुरु करण्याचा शासनाची तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांनी सदर निर्णयानुषंगाने खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

(१) आय.ए.एस. ॲकॅडमीसाठी प्रशिक्षणार्थी निवडण्यासाठी नियमावली तयार करुन त्यास शासन मान्यता घेण्यात यावी

(२) आय.ए.एस. ॲकॅडमीसाठी आवश्यक असलेल्या अधिकारी / कर्मचारी यांचा सुधारित आकृतीबंधात समावेश करुन सदर पदांचे सेवाप्रवेश नियम शासन मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत.

(३) प्रशिक्षकांचे मानधन, प्रवासभत्ता इ. निश्चित करुन त्यास शासनाची मान्यता घेण्यात यावी.

(४) आय.ए.एस. ॲकॅडमी सुरु करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबींच्या तपशिलवार खर्चास शासन मान्यता घेण्यात यावी.

(५) तसेच आय.ए.एस. ॲकॅडमी सुरु करण्यासाठी इतर आवश्यक बाबी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१०१७१७२४३९१४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.10.17 17:40:38 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.

**प्रति:-** १) मा अध्यक्ष, श्रीसाईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी.
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्रीसाईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी.
४) मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) निवड नस्ती/का.१६.